अपेडा प्राधिकृत कत्तलखान्याचे कामकाज सनियंत्रित करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्र. पविआ-१०२०/प्र.क्र.१४/पदुम-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-३२
दिनांक : १२ जानेवारी, २०२२.

वाचा :- १) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय, समक्रमांक दि.१४ जुलै,२०२०.
२) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय, समक्रमांक दि.२२ऑक्टोबर,२०२१.
३) कृषि व पदुम विभाग, शासन पत्र समक्रमांक दि.१ डिसेंबर,२०२१.

प्रस्तावना :-

अपेडा अथवा केंद्र/राज्य शासनाच्या तत्सम प्राधिकरणाद्वारे प्राधिकृत असलेल्या राज्यातील अधिकृत कत्तलखान्यांमध्ये महाराष्ट्र प्राणी रक्षण अधिनियम (सुधारणा), १९९५ अंतर्गत अनुसूचित पशूंच्या कत्तलपूर्व तपासणी करण्याकरिता वाचा मधील अ.क्र.१ व २ येथील शासन निर्णयान्वये गठीत करण्यात आलेल्या निवड समितीकडून निवड करण्यात आलेल्या खाजगी पशुवैद्यकांची नियुक्ती संबधित कत्तलखान्यांकडून करण्यात येते. तसेच वाचा मधील अ.क्र.३ येथील पत्रान्वये दिलेल्या निर्देशाप्रमाणे कत्तलखान्यावर नियुक्त करण्यात येणाऱ्या पशुवैद्यकांकडून बंधपत्र लिहून घेण्यात येते.

२. सदर कत्तलखान्यांमध्ये उक्त अधिनियमाच्या अनुसूचिमधील पशूंच्या कत्तलीपूर्वीची तपासणीची कार्यवाही योग्य पध्दतीने व नियमानुसार होत आहे किंवा कसे, त्याचप्रमाणे अशा ठिकाणी कोणतेही बेकायदेशीर कृत्य घडू नये यासाठी नियुक्त खाजगी पशुवैद्यकाच्या कामकाजावर संनियत्रण ठेवणे आवश्यक आहे. त्यासाठी आवश्यक ते आदेश निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**३. शासन निर्णय :-**

वर नमूद केलेली वस्तुस्थिती विचारात घेता, अपेडा प्राधिकृत कत्तलखान्यांमध्ये अनुसूचित पशूंची कत्तलपूर्व तपासणी करण्यासाठी नियुक्त केलेल्या खाजगी पशुवैद्यकांच्या कामकाजावर संनियंत्रण ठेवण्यासाठी खालीलप्रमाणे कार्यवाही करावी, असे शासन आदेश देत आहे:-

(१) राज्यातील अपेडा प्राधिकृत कत्तलखान्यांना भेट देऊन तपासणी करण्यासाठी खालील प्रमाणे दक्षता पथक स्थापना करण्यात येत आहे :-

(i) संबधित जिल्हयाचे जिल्हा उपायुक्त पशुसंवर्धन - अध्यक्ष
(ii) संबधित जिल्हयाचे जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी - सदस्य
(iii) संबधित जिल्हयाचे जिल्हा पशुवैद्यकीय सर्व चिकित्सालयाचे प्रमुख - सदस्य

(२) सदर दक्षता पथकाने आठवडयातून किमान एकदा त्यांच्या कार्यकक्षेतील कत्तलखान्यास भेट देऊन नियुक्त केलेले पशुवैद्यक योग्य ती तपासणी करतात किंवा कसे, याबाबतचा संबधित प्रादेशिक पशुसंवर्धन सहआयुक्त यांना अहवाल सादर करावा.

४. संदर्भाधीन क्र. १ येथील दिनांक १४ जुलै, २०२० रोजीच्या शासन निर्णयामधील तरतूदीनुसार संबंधीत कत्तलखान्याकडून खाजगी पशुवैद्यकांची ११ महिन्याकरीता नियुक्ती करण्यात येते. सदर पशुवैद्यकाने पूर्ण क्षमतेने काम करावे म्हणून ५८ वर्षापेक्षा अधिक वय असलेल्या पशुवैद्यकाची नियुक्ती कत्तलखान्यांकडून करण्यात येऊ नये.

५. सदर कत्तलखान्यांमध्ये ज्या ठिकाणी कत्तलपूर्व तपासणी करण्यात येते, त्या ठिकाणची पूर्ण जागा व्यापली जाईल, असे सीसीटीव्ही बसविणे अनिवार्य राहील.

६. सदर कत्तलखान्यामध्ये नियुक्त करण्यात येणारा खाजगी पशुवैद्यक हा कत्तलखाना मालकाचा / संचालकाचा नातेवाईक नसावा, याची दक्षता संबंधीत कत्तलखान्यानी घ्यावी.

७. नियुक्त करण्यात आलेल्या खाजगी पशुवैद्यकाकडून यापूर्वी त्यांना कोणत्याही फौजदारी गुन्हयाखाली शिक्षा झालेली नाही अथवा त्यांच्याविरुध्द कोणताही फौजदारी स्वरुपाचा गुन्हा दाखल झालेला नाही, असे बंधपत्रामध्ये लिहून घेण्यात यावे.

८. नियुक्त करण्यात आलेल्या खाजगी पशुवैद्यक, राजकीय पक्षाचा / संघटनेचा सदस्य नसल्याचे संबधितांकडून बंधपत्रामध्ये लिहून घेण्यात यावे.

९. तसेच नियुक्त करण्यात आलेल्या खाजगी पशुवैद्यकाकडून कत्तलखान्यावर नेमून देण्यात आलेल्या कामकाजाच्या कालावधीमध्ये इतर कोणत्याही संस्थेवर काम करणार नाही, असेही बंधपत्रामध्ये लिहून घेण्यात यावे.

१०. नियुक्त करण्यात आलेल्या पशुवैद्यकांना २ दिवसांचे ऑनलाईन यशस्वी प्रशिक्षण घेणे अनिवार्य राहील. सदर प्रशिक्षण महाराष्ट्र पशु व मत्स्यविज्ञान विद्यापीठ, नागपूर यांनी द्यावे. यासाठी रु.१०००/- एवढे शुल्क आकारण्यात यावे आणि सदरचे शुल्क संबधित कत्तलखान्याने भरावे.

११. उक्त प्रशिक्षणामध्ये प्रामुख्याने प्राण्यांना क्रुरतेने वागविण्यास प्रतिबंध करण्याबाबत अधिनियम, १९६० व महाराष्ट्र प्राणी रक्षण (सुधारणा) अधिनियम,१९९५ मधील तरतुदी तसेच या अधिनियमाखाली तयार करण्यात आलेल्या नियमातील तरतुदींचे पालन करुन पशूंची अशा पध्दतीने तपासणी करावी, त्याचप्रमाणे कत्तलपूर्व तपासणी मध्ये कोणकोणत्या बाबी तपासण्यात याव्यात, तपासणी नंतर द्यावयाच्या प्रमाणपत्रामध्ये कोणकोणती माहिती भरणे आवश्यक आहे इ. अनुषंगिक बाबींचा समावेश असेल.

१२. नियुक्त करण्यात आलेल्या खाजगी पशुवैद्यकांच्या मानधनाच्या एकत्रीत रकमेच्या ७ टक्के रक्कम अभिकरण शुल्क (Agency charges) म्हणून संबधित कत्तलखान्यांनी/असोसिएशनने महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, नागपूर यांना द्यावी.

१३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०११२१६५९११८७०१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIKAS TULSHIRAM KADAM

Digitally signed by VIKAS TULSHIRAM KADAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9869ec61c857e78e82b7a19b04c6d22f8ef1b8dbc9b19d45ef776d80ef148059, pseudonym=DC507174367F67372038B4A3876B5734B8B7FD46, serialNumber=406CB152E109154A7466C0050F88E5A437E17838973824687653A5E8D144B72B, cn=VIKAS TULSHIRAM KADAM
Date: 2022.01.13 11:15:55 +05'30'

**( विकास तु. कदम )**
शासनाचे अवर सचिव

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
२. आयुक्त पशुसंवर्धन, पशुसंवर्धन आयुक्तालय, पुणे.
३. सर्व जिल्हाधिकारी
४. सर्व जिल्हा पोलीस अधिक्षक
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, नागपूर.
६. कुलसचिव, महाराष्ट्र पशु व मत्स्यविज्ञान विद्यापीठ, नागपूर.

७. सर्व प्रादेशिक सह आयुक्त पशुसंवर्धन
८. मा. मंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
९. मा. राज्यमंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
१०. सर्व जिल्हा उप आयुक्त पशुसंवर्धन
११. सर्व जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद
१२. सर्व जिल्हा पशुवैद्यक सर्वचिकित्सालय
१३. प्रधान सचिव (पदुम) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई-३२.
१४. निवड नस्ती (पदुम-३).